


# महाराष्ट्र शासन राजपत्र
# असाधारण भाग चार

वर्ष १, अंक ३५(२)] गुरुवार, डिसेंबर २४, २००९/पौष ३, शके १९३१ [पृष्ठे ७, किंमत रुपये १८.००

असाधारण क्रमांक ६१

प्राधिकृत प्रकाशन

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.

अनुक्रमणिका



दिनांक २३ डिसेंबर २००९ रोजी मा. राज्यपालांनी संमती दिलेला महाराष्ट्र विधानमंडळाचा पुढील अधिनियम माहितीसाठी, याद्वारे, प्रसिद्ध करण्यात येत आहे.

ह. बा. पटेल,
सचिव,
महाराष्ट्र शासन,
विधी व न्याय विभाग.

---

## सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २७.

(मा. राज्यपालांची संमती मिळाल्यानंतर "महाराष्ट्र शासन राजपत्रात" दिनांक २४ डिसेंबर २००९ रोजी प्रथम प्रसिद्ध केलेला अधिनियम.)

**मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ आणि मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ यांमध्ये आणखी सुधारणा करण्याकरिता अधिनियम.**

**ज्याअर्थी,** राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नव्हते ;

१९४९ चा मुंबई ५९. १९५९ चा मुंबई ३. २००९ चा महा. अध्या. २१. **आणि ज्याअर्थी,** यात यापुढे दिलेल्या प्रयोजनासाठी, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ आणि मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ यांमध्ये आणखी सुधारणा करण्याकरिता महाराष्ट्राच्या राज्यपालांनी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली होती ; आणि, म्हणून, त्यांनी दिनांक ३१ ऑगस्ट २००९, रोजी मुंबई प्रांतिक महानगरपालिका व मुंबई ग्रामपंचायत (सुधारणा) अध्यादेश, २००९, प्रख्यापित केला होता ;

आणि ज्याअर्थी, उक्त अध्यादेशाचे राज्य विधानमंडळाच्या अधिनियमात रूपांतर करणे इष्ट आहे; त्याअर्थी, भारतीय गणराज्याच्या साठाव्या वर्षी, याद्वारे, पुढील अधिनियम करण्यात येत आहे :—

प्रकरण एक

**प्रारंभिक**

संक्षिप्त नाव व प्रारंभ. १. (१) या अधिनियमास, मुंबई प्रांतिक महानगरपालिका व मुंबई ग्रामपंचायत (सुधारणा) अधिनियम, २००९ असे म्हणावे.

(२) तो, दिनांक ३१ ऑगस्ट २००९ रोजी अंमलात आला असल्याचे मानण्यात येईल.

प्रकरण दोन

**मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ याची सुधारणा.**

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम २ ची सुधारणा. २. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ (या प्रकरणात यानंतर, ज्याचा निर्देश " प्रांतिक महानगरपालिका अधिनियम " असा करण्यात आला आहे), याच्या कलम २ मध्ये,— १९४९ चा मुंबई ५९.

(क) खंड (६क) मध्ये, " परंतु त्यात खंड (४२) मध्ये केलेल्या व्याख्येप्रमाणे असलेल्या जकातीचा समावेश होत नाही " या मजकुराऐवजी पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

" परंतु त्यात खंड (३१क) मध्ये व्याख्या केल्याप्रमाणे स्थानिक संस्था कराचा किंवा खंड (४२) मध्ये व्याख्या केल्याप्रमाणे जकातीचा समावेश होत नाही ";

(ख) खंड (३१) नंतर, पुढील खंड समाविष्ट करण्यात येईल :—

" (३१क) "स्थानिक संस्था कर " याचा अर्थ उपभोग, उपयोग किंवा विक्री यांसाठी शहराच्या हद्दीमध्ये होणाऱ्या मालाच्या प्रवेशावर प्रकरण अकरा-क च्या तरतुदींनुसार बसविण्यात आलेला कर, असा आहे. परंतु त्यात खंड (६क) मध्ये व्याख्या केल्याप्रमाणे उपकराचा आणि खंड (४२) मध्ये व्याख्या केल्याप्रमाणे जकातीचा समावेश होत नाही ;".

(ग) खंड (४२) मध्ये, " परंतु यामध्ये खंड (६क) मध्ये केलेल्या व्याख्येनुसार असलेल्या उपकराचा समावेश होत नाही " या मजकुराऐवजी, पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

" परंतु त्यात खंड (६क) मध्ये व्याख्या केल्याप्रमाणे उपकराचा किंवा खंड (३१क) मध्ये व्याख्या केल्याप्रमाणे स्थानिक संस्था कराचा समावेश होत नाही ".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ९९ ची सुधारणा. ३. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ९९ मध्ये, " उक्त कलमाच्या पोट-कलम (२) मध्ये निर्दिष्ट केलेल्या करांपैकी जे कोणतेही कर " या मजकुरानंतर, " (त्याच्या खंड (ककक) खालील स्थानिक संस्था कर वगळून) " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये नवीन कलमे ९९ख व ९९ग जादा दाखल करणे. ४. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ९९क, नंतर पुढील कलमे जादा दाखल करण्यात येतील :—

"९९ख. राज्य शासन, मुंबई सरकारी राजपत्रात, कलम १२७ च्या पोट-कलम (२) च्या खंड (ककक) मध्ये निर्दिष्ट केलेल्या मालाच्या विविध प्रवर्गांसाठीचे कर ज्या दरांनी व ज्या मर्यादेपर्यंत बसवण्यात येतील ते दर व त्या मर्यादा याबाबत आयुक्तांचा प्रस्ताव विचारात घेऊन आणि प्रकरण अकरा-ख मध्ये निर्धारित केलेल्या मर्यादांना व शर्तींस अधीन राहून, प्रत्येक वर्षी फेब्रुवारी महिन्याच्या वीस तारखेला किंवा त्यापूर्वी निश्चित करील आणि असे दर व अशी मर्यादा राजपत्रात अधिसूचित करील.

स्थानिक संस्था कराचे दर व मर्यादा निश्चित करणे.

९९ग. कलम १२७ च्या, पोट-कलम (२) च्या खंड (ककक) मध्ये विनिर्दिष्ट केलेला स्थानिक संस्था कर बसविण्याचे प्रथमच ठरविण्यात येईल त्या वेळी कोणत्याही वर्षाच्या १ एप्रिल पूर्वी, या अधिनियमाच्या कलम ९९ख च्या तरतुदी आणि इतर संबद्ध तरतुदी यांनुसार स्थानिक संस्था कर बसविला गेला नसेल त्या कलम ९९ख मध्ये काहीही अंतर्भूत केलेले असले तरी, राज्य शासनाला राजपत्रातील अधिसूचनेद्वारे, प्रकरण अकरा-ख मध्ये निर्धारित केलेल्या मर्यादा व शर्ती यांच्या व नियमांच्या अधीन राहून, ज्या दराने, आणि ज्या मर्यादेपर्यंत आणि ज्या तारखेपासून स्थानिक संस्था कर निर्धारित करण्यात येईल ते दर, मर्यादा व तारीख निश्चित करता येतील आणि त्यानंतर, अशा रीतीने अधिसूचित केलेल्या दरांनी, मर्यादांनी व तारखेपासून स्थानिक संस्था कर बसवण्यात येईल आणि या अधिनियमाचे कलम ९९ख व इतर तरतुदी यांद्वारे निर्धारित करण्यात आलेल्या कार्यपद्धतीचा अवलंब करण्यात आलेला असावा अशाप्रकारे या अधिनियमाच्या सर्व संबद्ध तरतुदी शक्य असेल तेथवर स्थानिक संस्था कराला लागू होतील. ".

कलम ९९ख च्या तरतुदी प्रथमतः स्थानिक संस्था कर बसविताना लागू न होणे.

५. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२७ मध्ये, पोट-कलम (२) मधील, खंड (कक) नंतर, पुढील खंड समाविष्ट करण्यात येईल :—

"(ककक) उपभोग, उपयोग किंवा विक्री यासाठी शहराच्या हद्दीमध्ये होणाऱ्या मालाच्या प्रवेशावर, राजपत्रातील अधिसूचनेद्वारे, राज्य शासनाने असा निदेश दिल्यास, जकात किंवा उपकर यांच्याऐवजी बसवावयाचा स्थानिक संस्था कर ;".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम १२७ ची सुधारणा.

६. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४९ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये कलम १४९क समाविष्ट करणे.

१९५८ चा मुंबई ६०.

"१४९क. (१) मुंबई मुद्रांक अधिनियम, १९५८ अन्वये स्थावर मालमत्तेची अनुक्रमे विक्री, देणगी व फलोपभोग गहाण यावरील संलेखावर बसवावयाच्या मुद्रांक शुल्कात, जेव्हा असा संलेख हा, कलम १२७ च्या पोट-कलम (२) च्या खंड (ककक) च्या तरतुदी ज्या शहरास (यात यापुढे या कलमात ज्याचा निर्देश "अधिसूचित शहर" असा करण्यात आला आहे) लागू होतात त्या शहरामध्ये स्थित असलेल्या स्थावर मालमत्तेच्या संबंधातील असेल ; आणि राज्य शासन, राजपत्रातील अधिसूचनेद्वारे, विनिर्दिष्ट करील अशा तारखेस किंवा त्यानंतर तो निष्पादित केला असेल तेव्हा, विक्री किंवा देणगीच्या बाबतीत अशा रीतीने स्थित असलेल्या मालमत्तेच्या मूल्यावर व फलोपभोग गहाणाच्या संलेखाच्या बाबतीत संलेखात मांडण्यात आलेल्या संलेखाद्वारे सुरक्षित रकमेवर एक टक्का या दराने अधिभार आकारून वाढ करण्यात येईल आणि उक्त अधिनियम अन्वये तो गोळा करण्यात येईल.

महानगरपालिका सीमेमधील स्थावर मालमत्तेच्या विनिमयपत्र हस्तांतरणावरील अतिरिक्त मुद्रांक शुल्क.

(२) या कलमाच्या प्रयोजनार्थ, मुंबई मुद्रांक अधिनियम, १९५८ चे कलम २८ च्या तरतुदी, — १९५८ चा मुंबई ६०.

(क) अधिसूचित शहरात स्थित असलेली मालमत्ता, आणि

(ख) अन्य कोणत्याही क्षेत्रात स्थित असलेली मालमत्ता,

यांच्या संबंधात, जणू काही त्यामध्ये निर्देशित केलेले तपशील स्वतंत्रपणे गाळून ती विनिर्देशपूर्वक आवश्यक केल्याप्रमाणे वाचण्यात येईल आणि अंमलात येईल.

(३) राज्य शासन, प्रत्येक वर्षी, याबाबतीत कायद्याद्वारे यथोचित विनियोजन करून, प्रत्येक अधिसूचित शहराच्या महानगरपालिकेला त्या महानगरपालिकेच्या अधिकारितेत स्थित असलेल्या स्थावर मालमत्तेच्या संबंधात या कलमान्वये बसवण्यात आलेल्या अधिभारामुळे वसूल केलेल्या अतिरिक्त शुल्काच्या रकमेएवढे अंदाजे सहायक अनुदान प्रदान करील.

(४) पोट-कलम (३) अन्वये राज्य शासनाने भागवावयाच्या खर्चाची आवश्यक रक्कम राज्याच्या एकत्रित निधीवर भारित असेल.

(५) शासनास, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, या कलमाची प्रयोजने पार पाडण्यासाठी नियम करता येतील.

(६) या कलमान्वये केलेले सर्व नियम पूर्वप्रसिद्धीच्या शर्तीस अधीन असतील.

(७) या कलमान्वये केलेला प्रत्येक नियम, तो करण्यात आल्यानंतर शक्य तितक्या लवकर, राज्य विधानमंडळाचे एक अधिवेशन किंवा लागोपाठची दोन अधिवेशने मिळून एकूण तीस दिवसांची होईल इतक्या मुदतीकरिता अधिवेशन चालू असताना राज्य विधानमंडळाच्या प्रत्येक सभागृहापुढे ठेवण्यात येईल आणि ज्या अधिवेशनात तो अशा रीतीने ठेवण्यात आला असेल ते अधिवेशन किंवा त्याच्या लगतनंतरचे अधिवेशन समाप्त होण्यापूर्वी, त्या नियमात कोणताही फेरबदल करण्यास दोन्ही सभागृहे सहमत होतील किंवा नियम करण्यात येऊ नये म्हणून दोन्ही सभागृहे सहमत होतील व तसा निर्णय **राजपत्रात** अधिसूचित करतील तर तो नियम अधिसूचना प्रसिद्ध करण्यात आल्याच्या दिनांकापासून, यथास्थिति, केवळ अशा फेरबदल केलेल्या स्वरूपातच अंमलात येईल किंवा तो नियम अंमलात येणार नाही; तथापि, असे कोणतेही फेरबदल किंवा विलोपन यामुळे त्या नियमान्वये पूर्वी केलेल्या किंवा करण्याचे राहून गेलेल्या कोणत्याही गोष्टीच्या विधिग्राह्यतेस बाध येणार नाही.".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये प्रकरण अकरा-ख समाविष्ट करणे.

**७.** प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५२ण नंतर, पुढील प्रकरण अकरा-ख आणि कलमे समाविष्ट करण्यात येतील :—

"प्रकरण अकरा-ख

**स्थानिक संस्था कराच्या संबंधातील तरतुदी**

स्थानिक संस्था कर आकारणी.

**१५२त.** या प्रकरणाच्या व नियमांच्या तरतुदींच्या अधीनतेने, या अधिनियमाच्या प्रयोजनार्थ, ज्या महानगरपालिकांना कलम १२७ च्या पोट-कलम (२) च्या खंड (कककक) च्या तरतुदी लागू होतात, त्या महानगरपालिकेला उपभोग, उपयोग किंवा विक्री यासाठी त्या शहराच्या हद्दीमध्ये होणाऱ्या, राज्य शासनाने, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, विनिर्दिष्ट केलेल्या मालाच्या प्रवेशावर, अशा अधिसूचनेमध्ये विनिर्दिष्ट केलेल्या दराने, स्थानिक संस्था कर बसविता येईल व तो गोळा करता येईल.

**१५२थ.** राज्य शासनास, याबाबतीतील अनुसूचीचा प्रस्ताव विचारात घेतल्यानंतर, आणि **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, मालाचे जे विविध प्रवर्ग कोणत्याही स्थानिक संस्था कर बसविण्यायोग्य नसतील ते प्रवर्ग विनिर्दिष्ट करता येतील. विविक्षित माल स्थानिक संस्था कर आकारणीयोग्य नसणे.

**१५२द.** प्रकरण अकरा-क च्या कलम १५२ख, १५२घ, १५२ङ, १५२च, १५२छ, १५२झ, १५२ज, १५२ट, १५२ठ, १५२ड, १५२ढ व १५२ण यांच्या तरतुदी, योग्य त्या फेरफारांसह, या प्रकरणाखालील स्थानिक संस्था कर बसविण्यास व तो गोळा करण्यास लागू होतील. प्रकरण अकरा-क च्या विवक्षित तरतुदींची प्रयोज्यता.

**१५२ध.** आयुक्तास, या अधिनियमान्वये स्थानिक संस्था कर बसविण्याच्या, तो गोळा करण्याच्या व वसूल करण्याच्या प्रयोजनार्थ, विहित करण्यात येईल अशा कालावधीसाठी व अशा रीतीने, अशा व्यापाऱ्यांचे निर्धारण करता येईल. व्यापाऱ्यांचे निर्धारण करणे.

**१५२न.** (१) राज्य शासनास, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, या प्रकरणाची प्रयोजने पार पाडण्यासाठी नियम तयार करता येतील. या प्रकरणाच्या प्रयोजनांसाठी नियम तयार करण्याचे राज्य शासनाचे अधिकार.

(२) या कलमान्वये केलेले सर्व नियम पूर्वप्रसिद्धीच्या शर्तीस अधीन असतील.

(३) या कलमान्वये केलेला प्रत्येक नियम, तो करण्यात आल्यानंतर शक्य तितक्या लवकर, राज्य विधानमंडळाचे एक अधिवेशन किंवा लागोपाठची दोन अधिवेशने मिळून एकूण तीस दिवसांची होईल इतक्या मुदतीकरता अधिवेशन चालू असताना राज्य विधानमंडळाच्या प्रत्येक सभागृहापुढे ठेवण्यात येईल आणि ज्या अधिवेशनात तो अशा रीतीने ठेवण्यात आला असेल ते अधिवेशन समाप्त होण्यापूर्वी, त्या नियमात कोणताही फेरबदल करण्यास दोन्ही सभागृहे संमत होतील किंवा नियम करण्यात येऊ नये म्हणून दोन्ही सभागृहे संमत होतील व तसा निर्णय **राजपत्रात** अधिसूचित करतील तर तो नियम अशी अधिसूचना प्रसिद्ध करण्यात आल्याच्या दिनांकापासून, यथास्थिति, केवळ अशा फेरबदल केलेल्या स्वरूपातच अंमलात येईल किंवा तो नियम अंमलात येणार नाही, तथापि, असे कोणतेही फेरबदल किंवा विलोपन यामुळे त्या नियमान्वये पूर्वी केलेल्या किंवा करण्याचे राहून गेलेल्या कोणत्याही गोष्टींच्या विधिग्राह्यतेस बाध येणार नाही. ".

प्रकरण तीन

**मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ याची सुधारणा**

१९५९ चा मुंबई ३. **८.** मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ (या प्रकरणात, यापुढे, ज्याचा निर्देश " ग्रामपंचायत अधिनियम " असा करण्यात आला आहे), याच्या कलम ३ मधील, — सन १९५९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ३ ची सुधारणा.

(क) खंड (४) नंतर, पुढील खंड समाविष्ट करण्यात येईल :—

" (५) " पदनिर्देशित प्राधिकारी " याचा अर्थ, स्थानिक संस्था कर बसविणे व तो गोळा करणे याच्या प्रयोजनासाठी राज्य शासनाकडून पदनिर्देशित केलेला प्राधिकारी, असा आहे ; ";

(ख) खंड (११) नंतर, पुढील खंड समाविष्ट करण्यात येईल :—

" (११क) " स्थानिक संस्था कर " याचा अर्थ, कलम १२४ क च्या तरतुदींनुसार खंड (११ग) च्या अर्थानुसार, अधिसूचित क्षेत्राच्या हद्दीमध्ये येणाऱ्या कोणत्याही गावाच्या हद्दीमध्ये, उपभोग, उपयोग किंवा विक्री यांसाठी होणाऱ्या मालाच्या प्रवेशावरील कर, असा आहे ;

(११ख) " अधिसूचित क्षेत्र " याचा अर्थ, ज्या क्षेत्रास स्थानिक संस्था कर बसविणे, तो निर्धारित करणे व तो वसूल करणे यांबाबतीतील मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ याचे कलम १२७ च्या पोट-कलम (२) याचे खंड (क क क) च्या तरतुदी व इतर तरतुदी लागू असतील असे खंड (११क) मध्ये व्याख्या केल्याप्रमाणे स्थानिक संस्था कर बसविण्याच्या प्रयोजनार्थ राज्य शासनाने, अधिसूचित केलेले शहराच्या हद्दीलगत असलेले सीमावर्ती क्षेत्र, असा आहे ;". १९४९ चा मुंबई ५९.

सन १९५९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ मध्ये कलम १२४क समाविष्ट करणे.

१. ग्रामपंचायत अधिनियमाच्या कलम १२४ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

स्थानिक संस्था करासंबंधातील तरतुदी.

" १२४क. (१) अधिसूचित क्षेत्रामधील प्रत्येक पंचायत या कलमाच्या तरतुदीनुसार अशा अधिसूचित क्षेत्रामधील उपभोग, उपयोग किंवा विक्री यांसाठी होणाऱ्या मालाच्या प्रवेशावर स्थानिक संस्था कर बसवील व गोळा करील.

(२) राज्य शासन, सर्वसाधारण किंवा विशेष आदेशाद्वारे, कोणत्याही प्राधिकाऱ्यास किंवा पंचायतीच्या सचिवास किंवा अन्य कोणत्याही अधिकाऱ्यास पदनिर्देशित प्राधिकारी म्हणून निर्देशित करील.

(३) मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ याच्या प्रकरण अकरा ख च्या व त्याखाली केलेल्या नियमांच्या तरतुदींनुसार उपभोग, उपयोग किंवा विक्री यासाठी अधिसूचित क्षेत्रामध्ये येणाऱ्या मालाच्या प्रवेशावर स्थानिक संस्था कर बसविणे व तो गोळा करणे आणि असा स्थानिक संस्था कर, शासनाच्या कोषागारात जमा करणे किंवा, जमा करण्याची व्यवस्था करणे ही जबाबदारी, पदनिर्देशित प्राधिकाऱ्याची असेल. १९४९ चा मुंबई ५९.

(४) राज्य शासन, प्रत्येक वर्षी, याबाबतीत कायद्याद्वारे यथोचित विनियोजन केल्यानंतर, ते क्षेत्र ज्या जिल्हाधिकाऱ्याच्या अधिसूचित क्षेत्राच्या कक्षेमध्ये येत असेल, अशा प्रत्येक पंचायतीस देण्यासाठी त्या पंचायतीच्या क्षेत्रामधून वसूल केलेल्या स्थानिक संस्था कराच्या रकमेइतकी अंदाजे रक्कम सहायक अनुदान म्हणून त्या जिल्हाधिकाऱ्याकडे सुपूर्द करील.

(५) पोट-कलम (४) अन्वये राज्य शासनाने भागवावयाच्या खर्चाची आवश्यक असलेली रक्कम राज्याच्या एकत्रीकृत निधीवर भारित असेल.".

## प्रकरण चार

### संकीर्ण

२००९ चा महा. अध्या. २१. **१०.** (१) मुंबई प्रांतिक महानगरपालिका व मुंबई ग्रामपंचायत (सुधारणा) अध्यादेश, २००९, हा, याद्वारे निरसित करण्यात येत आहे. सन २००९ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक २१ याचे निरसन व व्यावृत्ती.

१९४९ चा मुंबई ५९. १९५९ चा मुंबई ३. (२) अशाप्रकारे निरसन झाले असले तरी, उक्त अध्यादेशाद्वारे सुधारणा करण्यात आलेल्या मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ किंवा, यथास्थिति, मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ यांच्या तरतुदींन्वये करण्यात आलेली कोणतीही कृती किंवा कार्यवाही (काढण्यात आलेली कोणतीही अधिसूचना किंवा आदेश यांसह) ही, या अधिनियमाद्वारे सुधारणा करण्यात आलेल्या उक्त अधिनियमांच्या संबंधित तरतुदींन्वये करण्यात आलेली कोणतीही कृती, कार्यवाही किंवा, यथास्थिति, काढण्यात आलेली अधिसूचना किंवा आदेश असल्याचे मानण्यात येईल.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004. EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI





# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग आठ

वर्ष १, अंक ५३ (३) ] गुरुवार, डिसेंबर २४, २००९/पौष ३, शके १९३१ [ पृष्ठे ७, किंमत : रुपये २०.००

असाधारण क्रमांक १०५


**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधी व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).**

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Bombay Provincial Municipal Corporations and the Bombay Village Panchayats (Amendment) Act, 2009 (Mah. Act No. XXVII of 2009), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

H. B. PATEL,
Secretary to Government,
Law and Judiciary Department.

## MAHARASHTRA ACT NO. XXVII OF 2009.

[First published, after having received the assent of the Governor, in the "*Maharashtra Government Gazette*", on the 24th December 2009].

---

An Act further to amend the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949 and the Bombay Village Panchayats Act, 1958.

WHEREAS both Houses of the State Legislature were not in session;

AND WHEREAS the Governor of Maharashtra was satisfied that circumstances existed which rendered it necessary for him to take immediate action further to amend the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949 and the Bombay Village Panchayats Act, 1958, for the purposes hereinafter appearing; and, therefore, promulgated the Bombay Provincial Municipal Corporations and the Bombay Village Panchayats (Amendment) Ordinance, 2009, on the 31st August 2009;

Bom. LIX of 1949. Bom. III of 1959. Mah. Ord. XXI of 2009.

AND WHEREAS it is expedient to replace the said Ordinance by an Act of the State Legislature ; it is hereby enacted in the Sixtieth Year of the Republic of India as follows :—

## CHAPTER I

### PRELIMINARY

Short title and commencement.

1. (*1*) This Act may be called the Bombay Provincial Municipal Corporations and the Bombay Village Panchayats (Amendment) Act, 2009.

(*2*) It shall be deemed to have come into force on the 31st August 2009.

## CHAPTER II

### AMENDMENTS TO THE BOMBAY PROVINCIAL MUNICIPAL CORPORATIONS ACT, 1949.

Amendment of section 2 of Bom. LIX of 1949.

2. In section 2 of the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949 (hereinafter, in this Chapter, referred to as "the Provincial Corporations Act"),— Bom. LIX of 1949.

(*a*) in clause (*6A*), for the words, figures and brackets " but does not include octroi as defined in clause (*42*)", the following shall be substituted, namely :—

"but does not include Local Body Tax, as defined in clause (*31A*) or the octroi as defined in clause (*42*)" ;

(*b*) after clause (*31*), the following clause shall be inserted, namely :—

" (*31A*) "Local Body Tax" means a tax on the entry of goods into the limits of the City, for consumption, use or sale therein, levied in accordance with the provisions of Chapter XIB, but does not include cess as defined in clause (*6A*) and octroi as defined in clause (*42*) ; " ;

(*c*) in clause (*42*), for the words, figure, letter and brackets "but does not include a cess as defined in clause (*6A*) ", the following shall be substituted, namely :—

" but does not include a cess as defined in clause (*6A*) or Local Body Tax, as defined in clause (*31A*) ".

Amendment of section 99 of Bom. LIX of 1949.

3. In section 99 of the Provincial Corporations Act, after the words, figure and brackets " sub-section (*2*) of the said section " the words, brackets and letters " (excluding Local Body Tax under clause (*aaa*) thereof) " shall be inserted.

4. After section 99A of the Provincial Corporations Act, the following sections shall be inserted, namely :— Insertion of sections 99B and 99C in Bom. LIX of 1949.

"**99B.** The State Government shall, on or before the twentieth day of the February each year, after considering the proposal of the Commissioner in this behalf, and subject to the limitations and conditions prescribed in Chapter XIB, determine the rates and the extent to which the taxes referred to in clause (*aaa*) of sub-section (2) of section 127, shall be levied, for various categories of goods in the next ensuing official year and notify such rates and extent in the *Official Gazette*. Determination of categories of goods for Local Body Tax.

**99C.** In the event it is decided first time to levy Local Body Tax specified in clause (*aaa*) of sub-section (2) of section 127, if the Local Body Tax can not, by following the provisions of section 99B and the other relevant provisions of this Act, be brought into force on the 1st day of April of any year, then in that case, notwithstanding anything contained in section 99B, the State Government may, by notification in the *Official Gazette*, subject to the limitations and conditions laid down in Chapter XIB and the rules, determine the rates at and the extent to which and the date from which, the Local Body Tax shall be levied; and thereupon, the Local Body Tax shall be levied at the rates, extent and from the date so notified, and all the relevant provisions of this Act shall, so far as may be, apply to the Local Body Tax as if the procedure laid down by section 99B and the other provisions of this Act had been followed.". Provisions of section 99B not to apply to Local Body Tax to be first levied.

5. In section 127 of the Provincial Corporations Act, in sub-section (2), after clause (*aa*), the following clause shall be inserted, namely :— Amendment of section 127 of Bom. LIX of 1949.

"(*aaa*) Local Body Tax on the entry of the goods into the limits of the City for consumption, use or sale therein, in lieu of octroi or cess, if so directed by the State Government by notification in the *Official Gazette*;".

6. After section 149 of the Provincial Corporations Act, the following section shall be inserted, namely:— Insertion of section 149A in Bom. LIX of 1949.

Bom. LX of 1958. "**149A.** (*1*) The stamp duty leviable under the Bombay Stamp Act, 1958, on instruments of sale, gift and usufructuary mortgage, respectively, of immovable property shall, in the case of any such instrument relating to immovable property situated in the City to which the provisions of clause (*aaa*) of sub-section (*2*) of section 127 apply (hereinafter in this section referred to as " the notified City"); and executed on and after such date as may be specified by the State Government by notification in the *Official Gazette*, be increased by a surcharge at the rate of one per cent. in the case of sale or gift, on the value of the property so situated and in the case of an instrument of Additional Stamp duty on certain transfers of immovable properties in municipal areas.

usufructuary mortgage on the amount secured by the instrument as set forth in the instrument and shall be collected accordingly under the said Act.

(2) For the purposes of this section, section 28 of the Bombay Stamp Act, 1958, shall be read and enforced as if it specifically required the particulars therein referred to be set forth separately in respect of,— Bom. LX of 1958.

(a) the property situated in the notified City; and

(b) the property situated in any other area.

(3) The State Government shall, every year, after due appropriation made by law in this behalf, pay to the Corporation of each of the notified City, a grant-in-aid approximately equal to the amount of additional duty realized on account of the surcharge levied under this section in respect of immovable properties situated within the jurisdiction of that Corporation.

(4) The sum of money required to meet the expenditure by the State Government under sub-section (3), shall be charged on the Consolidated Fund of the State.

(5) The Government may, by notification in the *Official Gazette*, make rules to carry out the purposes of this section.

(6) All rules made under this section shall be subject to the condition of previous publication.

(7) Every rule made under this section, shall be laid as soon as may be, after it is made, before each House of the State Legislature while it is in session for a total period of thirty days which may be comprised in one session or in two successive sessions, and if, before the expiry of the session in which it is so laid or the session immediately following, both Houses agree in making any modification in the rule or both Houses agree that the rule should not be made, and notify such decision in the *Official Gazette*, the rule shall from the date of publication of such notification have effect only in such modified form or be of no effect, as the case may be, so, however, that any such modification or annulment shall be without prejudice to the validity of anything previously done or omitted to be done under that rule.".

Insertion of Chapter XIB in Bom. LIX of 1949.

7. After section 152O of the Provincial Corporations Act, the following Chapter and sections shall be inserted, namely:—

"CHAPTER XIB

PROVISIONS RELATING TO LOCAL BODY TAX

Levy of Local Body Tax.

152P. Subject to the provisions of this Chapter and the rules, the Corporation, to which the provisions of clause (aaa) of sub-section (2) of section 127 apply, may, for the purposes of this Act, levy and collect Local Body Tax on the entry of goods specified by the State Government by notification in the *Official Gazette*, into the limits of the City, for consumption, use or sale therein, at the rates specified in such notification.

Certain goods not liable to Local Body Tax.

**152Q.** The State Government may, after considering the proposal of the Commissioner in this behalf, and by notification in the *Official Gazette*, specify various categories of goods on which no Local Body Tax shall be leviable.

Applicability of certain provisions of Chapter XIA.

**152R.** The provisions of sections 152B, 152D, 152E, 152F, 152G, 152I, 152J, 152K, 152L, 152M, 152N and 152O of Chapter XIA shall *mutatis mutandis*, apply to levy and collection of Local Body Tax under this Chapter.

Assessment of Dealers.

**152S.** The Commissioner may, for the purposes of levy, collection and recovery of Local Body Tax under this Act, assess such dealers for such period and in such manner as may be prescribed.

Power of State Government to make rules for the purposes of this Chapter.

**152T.** (*1*) The State Government may, by notification in the *Official Gazette*, make rules to carry out the purposes of this Chapter.

(*2*) All rules made under this section shall be subject to the condition of previous publication.

(*3*) Every rule made under this section, shall be laid as soon as may be, after it is made, before each House of the State Legislature while it is in session for a total period of thirty days which may be comprised in one session or in two successive sessions, and if, before the expiry of the session in which it is so laid or the session immediately following, both Houses agree in making any modification in the rule or both Houses agree that the rule should not be made, and notify such decision in the *Official Gazette*, the rule shall from the date of publication of such notification have effect only in such modified form or be of no effect, as the case may be, so, however, that any such modification or annulment shall be without prejudice to the validity of anything previously done or omitted to be done under that rule.".

## CHAPTER III

### AMENDMENTS TO THE BOMBAY VILLAGE PANCHAYATS ACT, 1958.

Amendment of section 3 of Bom. III of 1959.

Bom. III of 1959. **8.** In section 3 of the Bombay Village Panchayats Act, 1958 (hereinafter, in this Chapter, referred to as "the Village Panchayats Act"),—

(*a*) after clause (*4*), the following clause shall be inserted, namely :—

"(*5*) "Designated Authority" means the authority designated by the State Government for the purpose of levy and collection of the Local Body Tax;";

(*b*) after clause (*11*), the following clauses shall be inserted, namely :—

"(*11A*) "Local Body Tax" means a tax on the entry of goods, into the limits of any village falling within the limits of the notified area within the meaning of clause (*11B*), for consumption, use or sale therein, levied in accordance with the provisions of section 124A;

(*11B*) "notified area" means the area, adjacent to the City, notified by the State Government for the purposes of levy of the Local Body Tax, as defined in clause (*11A*) to which the provisions of clause (*aaa*) of sub-section (*2*) of section 127 and other provisions of the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949 in respect of levy, assessment and recovery of the Local Body Tax, apply ;". Bom. LIX of 1949.

Insertion of section 124A in Bom. III of 1959.

9. After section 124 of the Village Panchayats Act, the following section shall be inserted, namely :—

Provisions relating to Local Body Tax.

"124A. (*1*) Every *Panchayat* in a notified area shall levy and collect the Local Body Tax on entry of goods for consumption, use or sale in such notified area in accordance with the provisions of this section.

(*2*) The State Government may, by general or special order, designate any authority, Secretary of the *Panchayat* or any other officer to be the Designated Authority.

(*3*) It shall be the responsibility of the Designated Authority to levy and collect the Local Body Tax on the entry of the goods into the notified area, for consumption, use or sale therein in accordance with the provisions of Chapter XIB of the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, and the rules made thereunder and to deposit or cause to be deposited into the treasury of the Government, such Local Body Tax. Bom. LIX of 1949.

(*4*) The State Government shall, every year, after due appropriation made by law in this behalf, place in the hands of the Collector to pay to each of the *Panchayats* whose area falls within a notified area, a grant-in-aid approximately equal to the amount of the Local Body Tax collected from the area of that *Panchayat*.

(*5*) The sum of money required to meet the expenditure by the State Government under sub-section (*4*), shall be charged on the Consolidated Fund of the State.".

## CHAPTER IV

### MISCELLANEOUS.

Mah. Ord. XXI of 2009. **10.** *(1)* The Bombay Provincial Municipal Corporations and the Bombay Village Panchayats (Amendment) Ordinance, 2009, is hereby repealed. Repeal of Mah. Ord. XXI of 2009 and saving

Bom. LIX of 1949. Bom. III of 1959. (2) Notwithstanding such repeal, anything done or any action taken (including any notification or order issued) under the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949 or, as the case may be, the Bombay Village Panchayats Act, 1958, as amended by the said Ordinance, shall be deemed to have been done, taken or issued, as the case may be, under the corresponding provisions of the said Acts, as amended by this Act.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21 A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004. EDITOR PARSHURAM JAGANNATH GOSAVI.